**महाराष्ट्र विकास सेवा गट -अ मधील उप मुख्य कार्यकारी अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांना अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी /प्रकल्प संचालक संवर्गात निव्वळ तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१९/प्र.क्र.१३४/२०१९/आस्था-३,
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: ०८ सप्टेंबर, २०२१.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील उप मुख्य कार्यकारी अधिकारी या संवर्गातील (वेतन स्तर एस-२३ : ६७७००-२०८७००) खालील अधिकाऱ्यांना अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी / प्रकल्प संचालक या संवर्गात (वेतन स्तर एस-२५ : ७८८००-२०९२०० ) निव्वळ तात्पुरती/तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दिनांक १४.०७.२०२१ नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहीत केलेल्या "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप नियम ,२०२१" मधील तरतूदींच्या अधिन नागरी सेवा मंडळाच्या शिफारशी तसेच सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने सदर अधिकाऱ्यांना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.०३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्रीम.एस.वाय.देसाई, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, जिल्हा कोल्हापूर | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा सातारा | रिक्तपदी |
| २. | श्रीम.व्ही.जी.गौरकर,उप मुख्य कार्यकारी अधिकारी (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा चंद्रपूर | रिक्तपदी |
| ३. | श्रीम.पी.पी.शिंदे, सहायक प्राध्यापक, यशदा, पुणे | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा उस्मानाबाद | रिक्तपदी |
| ४. | श्री.आर.पी.पाटील, सहायक आयुक्त (तपासणी), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा नंदुरबार. | रिक्तपदी |
| ५. | श्रीम.एस.ए.कडू-धोटे, (नियुक्तीशिवाय) | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा पुणे | श्री.एस.बी.लांगोरे यांचे जागी |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| ६. | श्रीम.प्रतिभा संगमनेरे, सहाय्यक आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा धुळे | श्री.बी.एम.मोहन यांचे जागी |
| ७. | श्री.पी.डी.यादव, प्रकल्प संचालक, जलजीवन मिशन,जिल्हा परिषद अहमदनगर | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,रत्नागिरी | रिक्तपदी |
| ८. | श्रीम.सी.यु.शिसोदे, (नियुक्तीशिवाय) | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा ठाणे | रिक्तपदी |
| ९. | श्री.वासुदेव सोळंके, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्र), जिल्हा परिषद, अहमदनगर | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड | रिक्तपदी |
| १०. | श्री.आर.व्ही.इंगळे, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, जिल्हा जालना | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा बुलढाणा | रिक्तपदी |
| ११. | श्री.टी.टी.माळी, प्रकल्प संचालक, जलजीवन मिशन,जिल्हा परिषद पालघर | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा पालघर | श्री.एम.एन.दिवे यांचे जागी |
| १२. | श्री.आर.एम.भुयार, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रापं), जिल्हा परिषद, नागपूर | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,गडचिरोली | रिक्तपदी |
| १३. | श्री.एस.टी.रौदंळ, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रापं), जिल्हा परिषद, नंदुरबार | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा वाशिम | रिक्तपदी |
| १४. | श्री.पी.एम.चौधरी, उपायुक्त, नाशिक महानगरपालिका, जिल्हा नाशिक | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,भंडारा | रिक्तपदी |
| १५. | श्री.व्ही.एस.सिद, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र मांजरी, जिल्हा पुणे | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा वर्धा | रिक्तपदी |
| १६. | श्रीम.आर.एस.खांडेकर, सहाय्यक आयुक्त (चौकशी), विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा परभणी | रिक्तपदी |
| १७. | श्रीम.पी.बी.देशमुख, सहायक आयुक्त (चौकशी), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती | प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा अमरावती | रिक्तपदी |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १८. | श्रीम.एस.एल.कबुनरे/पुंड, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रापं), जिल्हा परिषद,रायगड | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,गोंदिया | रिक्तपदी |
| १९. | श्री.एस.डी.तुबाकले,उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्र), जिल्हा परिषद, उस्मानाबाद | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा नांदेड | रिक्तपदी |
| २०. | श्री.ए.आर.पवार, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्र), जिल्हा परिषद,ठाणे | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,परभणी | श्री.व्ही.एस.मुळीक यांचे जागी |
| २१. | श्री.एम.एस.घुले, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्र), जिल्हा परिषद,पुणे | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,सातारा | रिक्तपदी |
| २२. | श्री.पी.एल.जाधव, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्र), जिल्हा परिषद, लातूर | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,लातूर | श्री.एस.डी.जोशी यांचे जागी |
| २३. | श्री.एस.पी.निकम, सहायक आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय ,नागपूर | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,वाशिम | रिक्तपदी |

३. सदर अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी/प्रकल्प संचालक संवर्गातील निव्वळ तात्पुरती पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे विशेष अनुज्ञा याचिका क्र .२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१६ ब यांच्या शासन निर्णय दि.०७.०५.२०२१ मधील तरतूदी नुसार पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधिन राहून भरण्यात येत आहेत.

रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये मा .उच्च न्यायालय,मुंबई यांनी दि.२५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधिन राहील .

४. वरीलप्रमाणे अधिकाऱ्यांना अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी/प्रकल्प संचालक संवर्गात खालील अटींच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती :-**

४.१) वरील अधिकाऱ्यांना देण्यात येणारी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी /प्रकल्प संचालक संवर्गातील निव्वळ तात्पुरती पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

४.२) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्यांना पदावनत करण्याच्या अधिन सदर तात्पुरत्या पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

४.३) सदरची पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरूपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे.

४.४) या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

५. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी/प्रकल्प संचालक संवर्गातील निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या वरीलप्रमाणे अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत सुचना द्याव्यात.

६. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी/प्रकल्प संचालक संवर्गातील निव्वळ तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रूजु व्हावे तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी सदर पदाचा पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा. संबंधित अधिकाऱ्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन नियुक्ती रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी. तसेच "वरीलप्रमाणे अधिकाऱ्यांना पदावर रूजु झाल्याशिवाय पदोन्नती लागू होणार नाही".

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२१०९०८१७०५४५०६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dr Vasant Gopal Mane

Digitally signed by Dr Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, cn=Dr Vasant Gopal Mane
Date: 2021.09.08 22:08:53 +05'30'

**(डॉ.वसंत माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव,

२) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव,

३) मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
४) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
५) मा. अतिरिक्त मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक,
६) विभागीय आयुक्त (सर्व),
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व),
८) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
९) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
१०) संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.),
११) कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास विभाग,
१२) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास विभाग.